**को.प.बंधारा सिंघनहळ्ळी ता.जत, जि.सांगली कामाच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.३१४/२०२२)/ सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- ८ ऑगस्ट, २०२४

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र.जा.क्र.मकृखोविम १६/(१७२/२०२२)/सिंव्य २ /५२६८/२०२२, दिनांक २९/७/२०२२.
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/सिंव्य (कामे),दि १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे),दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे),दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३.

**प्रस्तावना:-**

को.प.बंधारा सिंघनहळळी ता.जत, जि.सांगली हा बंधारा अवर्षण प्रवण क्षेत्रातील प्रकल्प असून हा प्रकल्प सन २००७ साली पुर्ण झाला आहे.सदर प्रकल्प सन २००९ मध्ये सिंचन व्यवस्थापनासाठी हस्तांतरीत करण्यात आला.या प्रकल्पाची एकूण साठवण क्षमता १.०५३ द.ल.घ.मी.इतका असून उपयुक्त पाणीसाठा १.०५३ द.ल.घ.मी. इतका आहे.महत्तम उंची ७.५ मीटर इतकी आहे तसेच बंधा-याची एकूण लांबी ८० मीटर आहे.

को.प.बंधा-याच्या D/s बाजूला बंधा-याच्या पायथ्यालगत पाण्याच्या प्रवाहामुळे खड्डे पडले आहेत.त्यामुळे को. प. बंधा-याच्या Stability ला धोका निर्माण झाला आहे.सदर खड्डे भरून त्याठिकाणी Rubble soiling करणे व त्यावर Concrete चे बांधकाम करणे ही कामे प्रस्तावित केली आहेत.को.प. बंधा-यावरील दगडी भिंतीची (Retaining wall) पूर्णत: पडझड झालेली आहे. सदर Retaining wall नव्याने बांधणे हे काम प्रस्तावित केले आहे.

सदर सिंघनहळळी को.प.बंधा-याची कामे पूर्ण होताच बंधा-यातून गळती कमी होवून अनावश्यक पाणीनाश थांबणार आहे.को.प.बंधा-याचे मजबुतीकरण होवून बंधारा जास्त कालावधीसाठी सुस्थितीत राहणार आहे. सिंचनक्षेत्र पुनर्स्थापित होवून महसूलात वाढ होणेस मदत होणार आहे.

बंधा-याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने बंधा-याची दुरूस्ती होणे आवश्यक असल्याने को.प.बंधारा सिंघनहळळी ता.जत,जि. सांगली या योजनेच्या दुरूस्ती कामास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत को.प.बंधारा सिंघनहळळी ता.जत,जि. सांगली या योजनेच्या विशेष दुरूस्ती कामाच्या रू २,५२,१६,१६९ /- (रू. दोन कोटी बावन्न लक्ष सोळा हजार एकशे एकोनसत्तर फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता , निविदा प्रक्रिया , कामाचे नियोजन व पूर्णत्व , प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर दुरूस्ती काम सुरु करण्यापूर्वी प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करून काम पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय अधिका-यांची राहील.

५) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

६) सदर कामास नियामक मंडळाच्या बैठकीत मंजूरी प्राप्त झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरुवात न करण्याची जबाबदारी सबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (००)(१५) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र) (कार्यक्रम) (४७०२ ७४५२) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. ११ सन २०२४-२५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावरwww.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०८०९१४५११०९३२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.08.09 15:08:22 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
**शासनाच्या उप सचिव**

**सोबत : सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री (वित्त/ जलसपंदा) यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
९) अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) अमुस (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१६) मुख्य अभियंता (जसं) ,जलसंपदा विभाग ,पुणे
१७) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१८) अधीक्षक अभियंता ,सांगली पाटबंधारे मंडळ,सांगली.
१९) कार्यकारी अभियंता, सांगली पाटबंधारे विभाग ,सांगली.
२०) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.३१४/२०२२)/ सिंव्य (कामे),**

**दि. ८ /८ / २०२४ चे सहपत्र**

| Sr.No. | Description of Item | Amount in ( Rs. ) |
|---|---|---|
| 1 | C - Works (Excluding Royalty) | 17441152 |
| 2 | Royalty | 3937965 |
| 3 | १ % Insurance | 174411 |
| 4 | १८ % GST | 3139407 |
| 5 | ३% Contingencies | 523234 |
| | **Total Rs.** | 2,52,16,169 |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.08.09 15:08:47 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**शासनाच्या उपसचिव**